नागरी स्वास्थ केंद्र वांद्रे, मुंबई या संस्थेस सन २०१९-२० या आर्थिक वर्षात राज्य योजनांतर्गत प्राप्त अनुदानातून सी.आर.मशीन च्या ऐवजी डी.आर.मशीन यंत्रसामुग्री खरेदीस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्रमांक : खरेदी-२०१९/प्र.क्र.२७६/प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नविन इमारत, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २४ सप्टेंबर, २०२१

वाचा :
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६ / प्र.क्र.२४० / आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६ / प्र.क्र.२४० / आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
४) शासन निर्णय,वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक खरेदी-२०१९ / प्र.क्र.२७६ / प्रशा-१, दिनांक १५.०१.२०२०
५) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं / नास्वाकेंवामुंबई/रायो/यंसाख/सु.प्र.मा/म/७१२९/२०२१, दिनांक : १५.०४.२०२१

शासन निर्णय :-

नागरी स्वास्थ केंद्र वांद्रे, मुंबई या संस्थेस आवश्यक असणाऱ्या यंत्रसामुग्रीस उपरोक्त दिनांक १५.०१.२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर प्रशासकीय मान्यतेतील Computerised Radiography Machine Multiloader (Mammography Compatible) कॉम्प्युटराईज्ड रेडीओग्राफी मशिन मल्टीलोडर (मेमोग्राफी कम्पेटीबल) या यंत्राऐवजी डिजीटल रेडिओग्राफी मशीन विथ डयुअल प्लॅट पॅनल डिटेक्टर विथ हाय फ्रिक्वेन्सी एक्स-रे मशीन या यंत्रास सुधारित मान्यता प्रदान करण्याची विनंती संचालनालयाने उपरोक्त दिनांक १५.०४.२०२१ च्या पत्रान्वये केली होती. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र | यंत्राचे नाव | नग | नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | डिजीटल रेडिओग्राफी मशीन विथ डयुअल प्लॅट पॅनल डिटेक्टर विथ हाय फ्रिक्वेन्सी एक्स-रे मशीन | १ | ३०,००,००० | ३०,००,००० |

अटी :-

१. सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता संबंधित संस्थेस राज्य योजनेतंर्गत मंजूर व उपलब्ध करून देण्यात आलेल्या अनुदानातून करण्यात येईल.

२. सुधारित यंत्रसामुग्रीची खातरजमा संबंधित संस्था व संचालनालयाने केलेली आहे.

३. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

४. सदर विषयी शासनाच्या समक्रमांकाच्या दिनांक १५.०१.२०२० मधील शासन निर्णयातील अन्य सर्व अटी व लेखाशीर्षाचे माध्यम कायम राहील.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेस खालील लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-०४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषमचिकित्सा राज्य योजनांतर्गत योजना |
| (००) (३७) | - | शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण श्रेणीवर्धन आणि यंत्रसामुग्री (४२१० १६२९) |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१० १६२९) |

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३ / प्र.क्र.३० / १३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९२४१६२८२४१३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Babanrao Surwase

Digitally signed by Prakash Babanrao Surwase
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=80b7aac85d2bc48d92746fc668ed758d69aeddf95746d0042863b2a0ce71dc1f, pseudonym=22F9E51BE81F4F3AE79C3DF8E5A0EFCCC3354857, serialNumber=6B133E92365A7935768A9BFA0220E77FC95C2726F4A9EB86D8D0C7E623A2B976, cn=Prakash Babanrao Surwase
Date: 2021.09.24 18:39:48 +05'30'

( प्रकाश सुरवसे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - १ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, सर ज.जी.समूह रुग्णालये, मुंबई

५. प्राध्यापक, नागरी स्वास्थ केंद्र, वांद्रे (पूर्व), मुंबई
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७. निवासी अधिकारी, मुंबई
८. निवडनस्ती (प्रशा-१).